**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन शुध्दिपत्र क्र. शेअवि २००९/प्र.क्र.२६८/११अे
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ५ मार्च, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र.शेअवि २००९/प्र.क्र.२६८/११अे, दि.४ डिसेंबर, २००९
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. शेजअवियो - २०१०-११/ का.सां.९ / प्र.क्र.९९/मा.सू./ ३५२/१०, दि.१८ ऑक्टोबर, २०१०

**प्रस्तावना :-**

शेती व्यवसाय करताना व नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अपघात उदा. रस्त्यावरील अपघात, वीज पडणे, विजेचा शॉक बसणे, पूर, सर्पदंश, विंचूदंश व वाहन अपघात तसेच अन्य कोणतेही अपघात यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढावतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता राज्यामध्ये शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना कार्यान्वित करण्यात आलेली आहे. सन २००९-१० पासून योजनेचे **शेतकरी जनता अपघात विमा योजना** असे नामाभिधान करण्यात आलेले आहे. शेतकरी जनता अपघात विमा योजनेच्या मार्गदर्शक सुचना उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये काही आवश्यक बदल तसेच काही बाबींचा नव्याने समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दिपत्र :-**

शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र.शेअवि २००९/ प्र.क्र.२६८/११अे, दि.४ डिसेंबर, २००९ अन्वये शेतकरी जनता अपघात विमा योजनेसंबंधिच्या मार्गदर्शक सुचना विहित करण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे काही बदल तसेच काही बाबींचा नव्याने समावेश करण्यात येत आहे-

| अ. क्र. | शासन निर्णयामधील मुद्दा क्र. | वगळण्याची बाब | करावयाचे बदल/ नव्याने सामाविष्ट करावयाची बाब |
|---|---|---|---|
| १ | २०. क) - जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | -- | ८) न्यायालयीन प्रकरणी दाव्यांचे कामकाज पाहण्यासाठी शासनाचे वतीने संपुर्ण कार्यवाही करणेसाठी 'सक्षम प्राधिकारी' (अभियोक्ता) म्हणून, तसेच जिल्हा ग्राहक तक्रार निवारण न्यायमंच येथे दाखल केल्या जाणाऱ्या तक्रारींच्या अनुषंगाने जिल्हा ग्राहक तक्रार निवारण न्यायमंच येथे कॅव्हेट दाखल करणेसाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. |
| २ | २०. क) - विभागीय कृषि सहसंचालक | -- | ३) संबंधित विमा सल्लागार कंपनी, विमा कंपनी व विभागातील जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे समवेत दरमहा आढावा बैठक घेऊन योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्यासाठी संनियंत्रण करावे व अहवाल आयुक्त (कृषि) यांना सादर करावेत. |
| ३ | २०. ड) - विमा सल्लागार कंपनी - १३) | शेतकरी जनता अपघात विमा योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यासाठी शासनास सल्ला/सहाय्य करण्यासाठी कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., मुंबई-२१ या इर्डा परवानाधारक विमा सल्लागार कंपनीची विमा सल्लागार म्हणून दिनांक २० ऑगस्ट, २००९ च्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात | शेतकरी जनता अपघात विमा योजना सन २०१०-११ मध्ये राबविण्यासाठी शासनास सल्ला/सहाय्य करण्यासाठी कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई -२१ (कोकण, पुणे, नाशिक, अमरावती व नागपूर या महसूली विभागांसाठी) आणि डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि., मुंबई (औरंगाबाद महसूल विभागासाठी) या दोन इर्डा परवानाधारक विमा सल्लागार कंपन्यांची विमा |

| | | | |
|---|---|---|---|
| | | आलेली आहे. आयुक्त (कृषि) यांनी विमा सल्लागार कंपनीबरोबर दिनांक २८ ऑगस्ट, २००९ रोजी केलेल्या करारानुसार विमा सल्लागार कंपनीने परिशिष्ट-१ मध्ये दर्शविलेल्या विभागीय कार्यालयांद्वारे शासनास विनामोबदला सहाय्य करावे. | सल्लागार म्हणून दिनांक २७ जुलै, २०१० च्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे. आयुक्त (कृषि) यांनी विमा सल्लागार कंपनीबरोबर दिनांक १३ ऑगस्ट, २०१० रोजी केलेल्या करारानुसार विमा सल्लागार कंपनीने शासनाचे वतीने परिशिष्ट-१ मध्ये दर्शविलेल्या त्यांच्या कार्यालयांद्वारे विना मोबदला काम करावे. |
| ४ | २०. ड) - विमा सल्लागार कंपनी | | १४) आयुक्त, कृषि यांचे बरोबर दिनांक १३ ऑगस्ट, २०१० रोजी केलेल्या करारानुसार महसूल विभागातील कार्यालयांव्दारे विनामोबदला काम करावे. कार्यक्षेत्रातील नियुक्त कालावधीतील न्यायालयीन दावे चालविण्यासाठी शासनाचे वतीने प्राधिकृत करण्यात येत आहे.<br>१५) सर्व विमा प्रस्ताव निकाली निघेपर्यंत या कामासाठी एका कर्मचाऱ्याची कृषि आयुक्तालयात नियुक्ती करावी.<br>१६) कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी व उपविभागीय कृषि अधिकारी यांच्यासाठी विभागीय कृषि सहसंचालक व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे सहकार्याने विभाग व जिल्हा स्तरावर एकदिवसीय प्रशिक्षण वर्ग आयोजित करावेत.<br>१७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे कार्यालयात प्राप्त झालेले विमा प्रस्ताव विमा सल्लागार कंपनीच्या कर्मचाऱ्याने जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे कार्यालयातच तपासून रीतसर पोच द्यावी तसेच अपूर्ण कागदपत्रांसंबधी लेखी सूचना द्यावी.<br>१८) विमा प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून ७ दिवसांत तपासणी/ पडताळणी करुन परिपूर्ण प्रस्ताव संबधित विमा कंपनीकडे मंजूरीसाठी सादर करावेत.<br>१९) विमा कंपन्यांनी विमा प्रस्तावांना मंजूरी देण्यास टाळाटाळ केल्यास विमा प्रस्ताव निकाली निघण्यासाठी आवश्यकतेनुसार खालील मार्गांचा अवलंब करावा-<br>अ) अनिर्णित विमा प्रस्ताव जिल्हा व विभागीय स्तरावरील जिल्हा नियंत्रण समिती/तक्रार निवारण समितीसमोर सादर करावेत.<br>ब) समित्यांच्या निर्णयाची वाट न पहाता विमा प्रस्ताव विमा कंपनीकडे सादर झाल्यानंतर तीन महिन्यांनी विमा कंपनीच्या 'तक्रार निवारण कक्षाकडे' (Dispute Redressal Machinery) दावा दाखल करावा.<br>क) 'विमा नियामक विकास प्राधिकरण' (इर्डा- IRDA) व 'विमा न्यायाधीश' (Ombudsman) यांचेकडे दावा दाखल करावा.<br>ड) 'जिल्हा, राज्य व राष्ट्रीय ग्राहक तक्रार निवारण मंच' येथे दावे दाखल करुन प्रलंबित विमा प्रस्ताव निकाली काढण्यासाठी आवश्यक कार्यवाही/प्रयत्न करावेत.<br>इ) विमा प्रस्तावासंबंधी शेतकऱ्याने न्यायालयात दावा दाखल केल्यास राज्य शासन/आयुक्त, कृषि यांना |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | प्रतिवादी केले जाते. अशा वेळी विमा सल्लागाराने कायदेशीर बाबींसाठी होणारा आवश्यक खर्च करावा तसेच सर्व प्रलंबित विमा प्रस्ताव निकाली काढण्यासाठी उचित कायदेशीर कार्यवाही करण्यासाठी होणारा खर्च विमा सल्लागार कंपनीने करावा. त्यासाठी शासनाकडून कोणतेही अर्थसहाय्य दिले जाणार नाही.<br>फ) दि. १० जानेवारी, २००५ ते ९ एप्रिल, २००६ या कालावधीतील आयसीआयसीआय लोंबार्ड या विमा कंपनीकडील प्रलंबित दाव्यांसंदर्भातील कायदेशीर कारवाई कबाल इन्शुरन्स ब्रोंकिग सर्व्हिसेस प्रा. लि. या विमा सल्लागार कंपनीने करावी. |
| ५ | २०. इ) विमा कंपनी - ८ | १) मृत शेतकऱ्याची पत्नी | १) मृत शेतकऱ्याची पत्नी/मृत शेतकरी स्त्रीचा पती. |
| ६ | २०. इ) विमा कंपनी | -- | ९) अपघातग्रस्त नोंदणीकृत खातेदाराच्या वयासंबंधी पुरावा उपलब्ध होऊ न शकल्यास विमा दावेदाराने/ कुंटुबातील सदस्याने अपघातग्रस्त खातेदाराच्या वयासंबंधी शपथपत्र दिल्यास असे शपथपत्र (Affidavit) ग्राहय धरण्यात यावे.<br>१०) अपघातग्रस्त वाहन चालकाच्या वाहनचालक परवान्याचा चालकाव्यतिरिक्त इतरअपघातग्रस्त शेतकऱ्यांच्या विमा प्रस्तावांशी कोणताही संबंध असणार नाही. |
| ७ | २१ | -- | २१.अ) कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि. व डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि. या शासन नियुक्त विमा सल्लागार कंपन्यांनी अनुक्रमे रुपये २० लाख व रुपये ५ लाख इतकी बँक गॅरंटी देणे अनिवार्य राहील. |
| ८ | प्रपत्र-ड | शासन निर्णयासोबतचे संपूर्ण प्रपत्र-ड | सुधारित प्रपत्र-ड |
| ९ | परिशिष्ट - १ | शासन निर्णयासोबतचे संपूर्ण परिशिष्ट-१ | सुधारित परिशिष्ट - १ |

२. हे शासन शुध्दीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०३०५२०५१००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**(ब. दि. उमाटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
६) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७) महाराष्ट्रातील सर्व लोकसभा/राज्यसभा सदस्य
८) सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य
९) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
१०)अपर मुख्य सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

११) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
१३) प्रधान सचिव, (अ.व सु.) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव, (मदत व पुनर्वसन), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व विभागिय महसूल आयुक्त
१६) सचिव, कृषि मंत्रालय, भारत सरकार,(कृषि व सहकार विभाग) कृषि भवन, नवी दिल्ली.
१७) सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार, (वित्त विभाग) (विमा), नवी दिल्ली
१८) आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) अध्यक्ष, कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा.लि., मित्तल टॉवर, ११८, बी विंग, ११ वा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई-२१
२०) कार्यकारी संचालक, डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि., एल स्क्वेअर, ऑफिस नं.१३, तिसरा मजला, सांघवी नगर, परिहार चौक, औंध, पुणे- ४११ ००७
२१) युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी लि., प्रादेशिक कार्यालय नागपूर, अंबिका भवन, क्र. १९, ३ रा मजला, धरमपेठ एक्स्टेंशन, शंकर नगर, नागपूर-४४० ०१०
२२) फ्युचर जनरली इंडिया इन्शुरन्स कंपनी लि., डीजीपी हाऊस, पहिला मजला,८८-सी, जुना प्रभादेवी मार्ग, प्रभादेवी, मुंबई-४०० ०२५
२३) दि न्यू इंडिया ॲश्युरन्स कं. लि., मंडल कार्या.१३०८००, १७/अे, सातवा मजला, कुपरेज रोड, न्यू इंडिया सेंटर, मुंबई- ४०० ०३९
२४) दि न्यू इंडिया ॲश्युरन्स कं. लि., मंडल कार्या.१५३४००, पहिला मजला, स्वातंत्र्यवीर सावरकर उद्योग भवन, शिवाजीनगर, पुणे-४११ ००५
२५) महालेखापाल महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२६) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
२७) अधिदान व लेखाअधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२९) विमा संचालक, म्हाडा ईमारत, १ला मजला, बांद्रा (पूर्व) मुंबई
३०) महासंचालक, माहिती आणि जनसंपर्क संचालनालय मंत्रालय, मुंबई
३१) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
३२) सर्व जिल्हाधिकारी
३३) सर्व तहसिलदार
३४) सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य
३५) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
३६) सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
३७) सर्व तालुका कृषि अधिकारी
३८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन ग्रंथालय, महाराष्ट्र विधानभवन, मुंबई ( ५ प्रती )
३९) महाराष्ट्र राज्यातील सर्व नोंदणीकृत पक्ष.
४०) सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग,(कृषि उपविभाग), मंत्रालय, मुंबई
४१) सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
४२) निवड नस्ती, ११अे

**सुधारित प्रपत्र - ड**

**शेतकरी जनता अपघात विमा योजना- अपघाताचे पुराव्यासाठी सादर करावयाची कागदपत्रे**

| अ.नं. | अपघाताचे स्वरुप | आवश्यक कागदपत्रे |
|---|---|---|
| १ | रस्ता/रेल्वे अपघात | प्रथम माहिती अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल |
| २ | पाण्यात बुडून मृत्यू | प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, स्थळ पंचनामा,इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल व अशा प्रकारच्या अपघातातील मृत व्यक्तीचे प्रेत न सापडल्यास ६ महिन्यांच्या प्रतिक्षा कालावधीनंतर सदर अपघातग्रस्ताच्या कुटुंबियांचे घोषणापत्र (Declaration) व अपघातग्रस्त खातेदाराचा बुडून मृत्यू झाल्याचे सक्षम प्राधिका-याचे (तलाठी/ग्रामसेवक) प्रमाणपत्र |
| ३ | जंतुनाशके हाताळताना अथवा अन्य कारणामुळे विषबाधा | प्रथम माहिती अहवाल (FIR)/ पोलीस पाटील अहवाल, शवविच्छेदन अहवाल, व्हिसेरा रिपोर्ट (रासायनिक विश्लेषण अहवाल) |
| ४ | विजेचा धक्का बसल्यामुळे झालेला अपघात | प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल (विजेचा धक्का (Electric Shock) बसुन झालेल्या अपघात प्रकरणी वीज वितरण कंपनीचा अहवाल/प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक नाही) |
| ५ | वीज पडुन मृत्यू | प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल |
| ६ | खून | प्रथम माहिती अहवाल / स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल |
| ७ | उंचावरुन पडून झालेला अपघात | प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल |
| ८ | संर्पदंश/विंचूदंश/ जनावराने चावा घेणे /रेबीज/कोणत्याही प्राण्याने जखमी केल्यामुळे अपंगत्व येणे किंवा मृत्यू ओढावणे | उपलब्धतेनुसार प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल, रासायनिक विश्लेषण अहवाल (Viscera Report) (रकाना नं. २- 'अपघाताचे स्वरुप ' मध्ये निर्देशित केलेल्या कारणांपैकी कोणत्याही कारणामुळे मृत्यू झाला असा निष्कर्ष पोस्ट मॉर्टेम अहवालानुसार निघत असेल तर विमा कंपनी दावेदाराकडुन रासायनिक विश्लेषण अहवालाची (Viscera Report) मागणी करणार नाही. शव विच्छेदन अहवाल (P. M. Report) किंवा वैद्यकीय विश्लेषण अहवाल उपलब्ध होऊ शकत नसल्यास अशा प्रकरणी अपघातग्रस्ताच्या अपंगत्व अथवा मृत्यूबाबतचे इंडियन मेडिकल असोसिएशनचे मान्यताप्राप्त वैद्यकीय व्यावसायिकाने दिलेले प्रमाणपत्र, किंवा प्राथमिक आरोग्य केंद्र/उपकेंद्र येथील सक्षम अधिका-याने दिलेले प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे. श्वापदाने अपघातग्रस्ताचे शरीर ओढत नेल्यामुळे व खाऊन टाकल्यामुळे मृतदेह सापडत नसल्यास ६ महिन्यांच्या प्रतिक्षेनंतर कुटुंबातील सदस्याचे घोषणापत्र (Declaration) व अपघातग्रस्त व्यक्ती श्वापदाच्या हल्ल्यामध्ये मृत्यू पावली असे सक्षम प्राधिका-याचे (तलाठी/ग्रामसेवक) प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.) |
| ९ | नक्षलवाद्याकडून झालेल्या हत्या | प्रथम माहिती अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल |
| १० | दंगलीमध्ये अपंगत्व अथवा मृत्यू | प्रथम माहिती अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, पोस्ट मॉर्टेम अहवाल |
| ११ | आगीमुळे झालेला अपघात | प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, पोस्ट मॉर्टेम अहवाल, (जर अपघातग्रस्त शेतक-याचे शरीर आगीत पूर्णपणे जळून भस्म झाले असेल तर अपघातग्रस्तांच्या कुटुंबियांचे घोषणापत्र (Declaration) व सक्षम प्राधिका-याचे (तलाठी/ग्रामसेवक) प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे) |
| १२ | अन्य कोणतेही अपघात | प्रथम माहिती अहवाल / पोलीस पाटील अहवाल, स्थळ पंचनामा, इन्क्वेस्ट पंचनामा, आणि सक्षम प्राधिका-याने अपघात घडुन मृत्यू झाल्याचे/ कायमचे अपंगत्व आल्याचे दिलेल्या प्रमाणपत्राची साक्षांकित सत्य प्रत |

**टीपः-**

१) विमा प्रस्ताव दाखल करताना प्रस्तावासोबत प्रथम माहिती अहवाल (FIR) व शवविच्छेदन अहवाल (Post Mortem Report) यांच्या मूळ प्रती सादर न करता प्रमाणपत्रांच्या साक्षांकित सत्य प्रती (साक्षांकित करणेस सक्षम असलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याने साक्षांकित केलेल्या) सादर कराव्यात. तसेच इतर प्रमाणपत्रांच्या/ कागदपत्रांच्या साक्षांकित सत्य प्रती (सक्षम अधिकाऱ्याने साक्षांकित केलेल्या) विमा कंपनीने स्विकारणे बंधनकारक आहे.

२) कोणत्याही अपघातामुळे अपंगत्व आल्यास पुढीलप्रमाणे कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहे -

प्रथम माहिती अहवाल / स्थळ पंचनामा (अ) अपंगत्वाची कारणे किंवा एखादा अवयव अकार्यक्षम /निकामी होण्याची कारणे दर्शविणारे वैद्यकीय व्यावसायिकाने दिलेले प्रमाणपत्र किंवा वैद्यकीय उपचारासंबधीची कागदपत्रे

(ब) प्राथमिक आरोग्यकेंद्र किंवा उपजिल्हा आरोग्यकेंद्राच्या अधिका-यांनी दिलेले व जिल्हा शल्यचिकित्सक यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले प्रमाणपत्र.

अपघातामुळे आलेल्या अपंगत्वाचे प्रमाणपत्रामध्ये अपंगत्वाचे प्रमाण टक्केवारीमध्ये दर्शविलेले असते. कायमस्वरुपी अपंगत्वासाठीचा दावा / विमा प्रस्ताव अदा करण्यासाठी वैद्यकीय व्यावसायिकाने (Medical Practitioner) अपघातग्रस्त शेतक-याचा अवयव अथवा डोळा गमावला आहे असे प्रमाणपत्रात नमूद केलेले असल्यास अपंगत्वाची दर्शविलेली टक्केवारी (The % Disability) दुर्लक्षित करुन अशा प्रमाणपत्राचे आधारे विमा कंपनीने विमा प्रस्ताव अंतिम करावा.

**सुधारित परिशिष्ट-१**

| अ.क्र. | विमा सल्लागार कंपनीची कार्यालये | अ.क्र. | विमा सल्लागार कंपनीची कार्यालये |
|---|---|---|---|
| | **अ) कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि.,** | | |
| **१** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., युनिट नं.२०, पहिला मजला, ओरिएंटल हाऊस, ३-अे, उद्योग नगर, बालाजी टेलिफिल्मच्या पुढे एस.व्ही.रोड, गोरेगाव (प), मुंबई- ४०० ०६२<br>फोन. नं. ०२२-२८७९१०९३/९४<br>फॅक्स नं-०२२-२८७९१०९२<br>ई-मेल- cabalgrg@yahoo.co.in | **७** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., फ्लॅट नं.१ पारिजातअपार्टमेंट, प्लॉट नं. १३५, सुरेंद्रनगर, नागपूर-४४० ०१५<br>फो.नं. ०७१२-६४५११४७<br>फॅक्स नं. ०७१२- २२४७५८७<br>ई-मेल- cabalnagpur@rediffmail.com |
| **२** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., एशियाटिक आर्केड, गाळा नं.५०, पोखरण रोड नं. १, वर्तक नगर, ठाणे (पश्चिम) - ४०० ६०६<br>फो. नं. ०२२-२५८८६४५३<br>मो.नं. ९००४०२२००६<br>फॅक्स नं-०२२-२५८८६३२८<br>ई-मेल - cabalthane@gmail.com | **८** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., फ्लॅट नं. इ -२, आत्मबंधु आर्केड, नाचणे रोड,मारुती मंदीर, रत्नागिरी - ४१५ ६१२<br>टेलिफॅक्स नं- ०२३५२-२२७७७७<br>ई-मेल -cabalkonkan@yahoo.co.in |
| **३** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., ४/अे, देहमंदिर को.ऑप.हौ.सो., श्रीरंग नगर, पम्पींग स्टेशन रोड, गाणगापूर रोड, नाशिक - ४२२ ०१३<br>फो. नं. ०२५३-२३१३२५७<br>ई-मेल - cabalnashik@gmail.com | **९** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., प्लॉट नं. जी/११ अे, हिरा आर्केड, मयुरा गॅस एजन्सी जवळ, वनवासवाडी, कृष्णानगर, सातारा-४१५००१<br>टेलिफॅक्स- ०२१६२-२४५७१५<br>ई-मेल-cabalsatara@yahoo.com |
| **४** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., १०१,शिवाजी नगर, ३ रा मजला, मंगला टॉकीज जवळ, पुणे - ४११ ००५<br>फो.नं. ०२० - २५५२१४१२<br>फॅक्स नं. ०२० - २५५२१४१३<br>ई-मेल - cabalpune@yahoo.com | **१०** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, डीआरडीए ऑफिस, जिल्हा परिषद, सोलापूर- ४१३००१<br>मो.नं. ९८५०११०७५१/ ९००४०२२०१९ |
| **५** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., राज अपार्टमेंट, प्लॉट नं.२९, जी- सेक्टर, रिलायन्स फ्री बेही च्या मागे, औरंगाबाद - ४३१००३<br>टेली फॅक्स नं. ०२४०-६६१०११६/६५१३५७७<br>ई-मेल- cabal_aurangabad@yahoo.co.in<br>cabalaurangabad@gmail.com | **११** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., बसवेश्वर कॉम्प्लेक्स, तळमजला, फ्लॅट-३ जी , हॉटेल सदानंदच्या समोर, सांगली-मिरज रोड, सांगली- ४१६४१६<br>फो.नं. ०२३३-२३२२९६६<br>ई-मेल cabalsangli@gmail.com |
| **६** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., सिंधुदुर्ग अपार्टमेंट, जोगळेकर प्लॉट, रुक्मीणी नगर जवळ, जगताप पेट्रोल पंपामागे, अमरावती - ४४४ ६०६<br>फो.नं.०७२१- ६४५०६४६<br>फॅक्स नं. ०७२१- २५७४६४६<br>ई-मेल - cabalamravati@gmail.com | **१२** | कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा. लि., ब्लॉक नं.५, २ रा मजला, स्टार टॉवर, ५, बंगला एरिया, शाहुपुरी, कोल्हापूर-४१६००१<br>मो.नं. ९००४३८४५८३/ ९८९०५१११२३<br>ई-मेल<br>shashi_hajare@rediffmail.com |

| ब) डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि., मुंबई | | | |
|---|---|---|---|
| १ | श्री.नंदकुमार देशपांडे, विभागीय प्रमुख,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>फरकडे बिल्डींग, बिग बाझारच्या मागे, भानुदास नगर, आकाशवाणी चौक, औरंगाबाद - १<br>फोन/फॅक्स नं. ०२४०-२३५४८५५<br>मोबाईल नं. ९४२२२४५५७०<br>ईमेल-deshpande@deccaninsurance.com<br>deshpandenp@gmail.com | ६ | श्री.श्रीकांत पतंगे, हिंगोली जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>द्वारा, शरद माहोरे, महावीर टाईप रायटिंग इन्स्टिट्युट, नगर परिषदे समोर, हिंगोली.<br>मोबाईल नं. ९७६७८९३९३१<br>ईमेल -Shripatange@yahoo.co.in |
| २ | श्री.नरेंद्र जोशी, औरंगाबाद व जालना जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>फरकडे बिल्डींग, बिग बाझारच्या मागे, भानुदास नगर, आकाशवाणी चौक, औरंगाबाद - १<br>मोबाईल नं. ८०५५७४१२८०<br>ईमेल -deshpande@deccaninsurance.com | ७ | श्री.सतिश देशमुख, परभणी जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>द्वारा, दिपक देशमुख, लंगोटे गल्ली, परभणी<br>मोबईल नं. ९७६७८९३९३० |
| ३ | श्री.संतोशकुमार नागप्पा धनशेट्टी, बीड जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>अयोध्या नगर, नवी मोरेवाडी, नागार्जुना किराणा सेंटरच्या मागे, अंबेजोगाई<br>मोबाईल नं. ९४०४५०७३९५<br>ईमेल-santoshdhanshette@rediffmail.com | ८ | श्री.संजय धस, मुंबई समन्वयक<br>श्री.डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>सहावा मजला, न्यू एक्सेलसियर सिनेमा बिल्डींग, वॉलेस स्ट्रीट, फोर्ट,मुंबई -१<br>मोबाईल नं.९८६७९७७५६४<br>ईमेल-sd@deccaninsurance.com |
| ४ | श्री.रेवनकुमार धनशेट्टी, लातूर व उस्मानाबाद जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>अयोध्या नगर, नवी मोरेवाडी, नागार्जुना किराणा सेंटरच्या मागे, अंबेजोगाई<br>मोबाईल नं. ९४०४६६८३२६ | ९ | श्री.राजेश अलोने, पुणे जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>ऑफीस नं. १३ व १४, तिसरा मजला,एल स्क्वेयर, सांघवी नगर, परिहार चौक,औंध,<br>पुणे - ४११ ००७<br>टेलीफॅक्स - ०२०-६६४०७४०५/०६<br>मोबाईल- ९९७०३९१०१३, ९८५०४४२९८२<br>ईमेल - rajesh@deccaninsurance.com |
| ५ | श्री.प्रविण जोशी, नांदेड जिल्हा समन्वयक,<br>डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा. लि.,<br>पहिला मजला, जनता मार्केट, शिवाजी नगर, नांदेड<br>मोबाईल नं. ९७६७८९३९३५<br>ईमेल - JoshiPravin26@yahoo.in | | |